**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, परभणी या कार्यालयाच्या ब्रेक टेस्ट ट्रॅक तयार करण्याच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१११६/प्र.क्र.४९२/परि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १६जानेवारी २०२०

वाचा :-

1) **गृह विभाग, शासन ज्ञापन समक्रमांक, दि.२५.११.२०१६**
2) **अपर परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय यांचे पत्र क्र. PIL२८/ २०१८/ १०१८/ न.क्र.४(३)/का.१०/२०१८/जा.क्र.१२०५४, दि.०५.०९.२०१९**
3) **उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,परभणी यांचे पत्र क्र. जा. क्र.२५७५/ रवका/ उपप्रापका/ परभणी/१९, दि.२८.११.२०१९**

प्रस्तावना :-

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, परभणी या कार्यालयाकरीता मौजे असोला ता. जि. परभणी येथील जागेमध्ये ब्रेक टेस्ट ट्रॅक तयार करण्यासाठीच्या रु.४३,१७,१३९/- (रुपये त्रेचाळीस लक्ष सतरा हजार एकशे एकोणचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास वाचा क्र. १ येथील शासन ज्ञापनान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. सदर ब्रेक टेस्ट ट्रॅक च्या उभारणीच्या कामामध्ये i) ३ नग मोठे नळकांडी पुल व २ नग (३० मी. व १६ मी. लांबीचे) जोडरस्ते बांधणे ii) काळ्या मातीची प्रक्रिया करणे व ट्रॅक शेजारी ओपन ड्रेनचे खोदकाम करणे iii) ट्रॅक शेजारी वाहन तळ तयार करणे व अतिरिक्त झाडेझुडपे काढणे iv) १२ टक्के जीएसटी व १ टक्के लेबर इंशोरन्स ची अतिरिक्त तरतुद या कारणांमुळे खर्चात वाढ झाली आहे. त्यानुषंगाने, सदर कामाचे सुधारित अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता , सार्वजनिक बांधकाम उप विभाग, परभणी यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,परभणी यांनी प्रमाणीत केले आहे. प्रस्तुत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, परभणी या कार्यालयाकरीता ब्रेक टेस्ट ट्रॅक तयार करण्यासाठीच्या रु.६६,६९,५५०/- (अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष एकोणसत्तर हजार पाचशे पन्नास फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर सुधारीत अंदाजपत्रकानूसार कामांच्या खर्चाचा तपशील खालील प्रमाणे आहे.

| No | Particulars | Amount |
|---|---|---|
| 1 | Cost of Estimate | 5700470.00 |
| 2 | Add 12% for GST | 684056.00 |
| 3 | Add 4% Contingencies | 228019.00 |
| 4 | Add 1% Labour Insurance | 57005.00 |
| | **Total Amount** | **6669550.00** |

२. प्रस्तुत कामास दि.२५.११.२०१६ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता दिली असल्याने रु.४३,१७,१३९/- सदर सर्व रक्कम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांचेकडे वर्ग करण्यात आलेली आहे. सुधारीत अंदाजपत्रकानुसार सदर कामाची किंमत रु.६६,६९,५५०/- इतकी असल्याने रु.२३,५२,४४१/- (सुधारीत अंदाजपत्रक रु.६६,६९,५५०- मुळ प्रशासकीय मान्यता रु.४३,१७,१३९ =रु.२३,५२,४११/-) इतक्या वाढीव रकमेस मान्यता देण्यात येत आहे.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.०९/२०२०/इमा-२, दि.०८.०१.२०२० अन्वये, सदर खर्च विभागाने उपलब्ध असलेल्या निधीतून भागवावा व सदर काम रु.६६,६९,५५०/- इतक्या रकमेस पूर्ण होईल असे पहावे या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शाविली आहे.

४. सदरहू प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने आवश्यक निधीची तरतूद स्वतंत्र्यपणे करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११६१६४३०५७८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM
DATTATRAY
HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.01.16 16:45:26 +05'30'

( द.ह. कदम )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव

३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (निरिक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड
८. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,परभणी
९. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
१०.उप सचिव (इमा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११.कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती (परि-४)